**कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत 'अन्नधान्य पिकांकरीता' सर्वसाधारण प्रवर्गाकरीता सन २०१७-१८ करीता ₹ ९५०४.५३ लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : असुअ ०३१७/प्र.क्र.१२/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०७ जुन, २०१७

वाचा:-

१. केंद्रीय कृषि मंत्रालयाचे पत्र No. २-१/२०१७-NFSM, दि.०९/०३/२०१७
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. ०३१७/प्र. क्र. १८ /राकृवियो कक्ष, दि.१३/०४/२०१७
३. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दि. १८/०४/२०१७
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९/०४/२०१७
५. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र - No. CPS २-१६/२०१७-NFSM, दि. ०२/०५/२०१७
६. शासन निर्णय क्र. असूअ ०३१७/प्र.क्र. १२/राकृवियो कक्ष, दि.१५/०५/२०१७
७. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र No. F.No.२-२७/२०१७ - NFSM दि. २३/०५/२०१७

प्रस्तावना :-

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियांतर्गत समाविष्ट पिकांच्या उत्पादन व उत्पादकतेत वाढ करणे, शेत जमिनीची सुपीकता व उत्पादकता वाढविणे, रोजगारांची संधी निर्माण करणे व शेतक-यांच्या उत्पादनात वाढ करणे ही प्रमुख्य उद्दीष्ट आहेत.

सन २०१७-१८ करीता केंद्र शासनाने दि.०९.०३.२०१७ रोजी महाराष्ट्राकरीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी मंजूर केलेल्या ₹ २४०३४.३७ लाख रकमेच्या नियतवाटपाच्या (Allocation) अनुषंगाने राज्य शासनाने अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी (भात, गहू, कडधान्य व भरडधान्य) ₹ २४०३४.३७ लाख रकमेचा कृती आराखडा केंद्र शासनाच्या मंजूरीस्तव सादर केला होता. त्यास केंद्र शासनाने संदर्भांकित दि.०२/०५/२०१७ रोजीच्या पत्रान्वये मंजूरी दिली आहे.

त्यानुषंगाने चालू वर्षी सदर अभियानाची ₹ २४०३४.३७ लाख रकमेच्या कृती आरखडयास संदर्भांकित दि.१५.०५.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे, सदर अभियान केंद्र व राज्याच्या ६०:४० अर्थसहाय्याने राबविण्यात येणार आहे, त्यानुसार अभियानांतर्गत केंद्र शासनाचा ₹ १४४२०.६२ लाख व राज्य शासनाचा ₹ ९६१३.७५ लाख आर्थिक सहभाग राहील.

केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाच्या वार्षिक कृती आराखडयापैकी पहिल्या हफ्त्यामध्ये भात, भरडधान्य व कडधान्यांकरीता एकूण **₹** ७०४९.०९ लाख निधी दि. २३ मे, २०१७ रोजी प्रवर्गनिहाय वितरीत केला आहे. त्यानुषंगाने सर्वसाधारण प्रवर्गाकरीता अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता प्राप्त झालेला केंद्र हिस्याचा **₹** ५७०२.७२ लाख निधी व राज्य हिस्याचा ₹ ३८०१.८१ लाख असा एकूण ₹ ९५०४.५३ लाख निधी खरीप हंगामाच्या पार्श्वभूमीवर वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०१७-१८ करीता कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता **सर्वसाधारण प्रवर्गासाठी** केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण **₹९५०४.५३ लाख (रुपये पंच्यान्नव कोटी चार लाख त्रेपन्न हजार फक्त) निधी** या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषी), पुणे, यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पिक निहाय व प्रवर्ग निहाय उपलब्ध करुन देण्यात येत आहे, सदर निधीपैकी केंद्र व राज्य हिस्साच्या वितरीत निधीचे विवरण पुढीलप्रमाणे -

**(₹ लाख)**

| **अ.क्र.** | **राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत पिके** | **सर्वसाधारण प्रवर्ग** | | **एकूण** |
|---|---|---|---|---|
| | | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | |
| १. | भात | ३३६.५४ | २२४.३६ | ५६०.९० |
| २. | कडधान्य | ४५७३.६८ | ३०४९.१२ | ७६२२.८० |
| ३. | भरडधान्य | ७९२.५० | ५२८.३३ | १३२०.८३ |
| **एकूण** | | **५७०२.७२** | **३८०१.८१** | **९५०४.५३** |

२. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला केंद्र हिस्याचे ₹५७०२.७२ लाख (रुपये सत्तावन्न कोटी दोन लाख बाहत्तर हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षातर्गत सन २०१७-१८ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्रमांक डी-३**

**२४०१- पीक संवर्धन**

**(००) (१०२) अन्नधान्य पिके**

**(००) (२५) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके**

**(केंद्र हिस्सा ६०%) (केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ ४६१४)**

**(योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य**

तसेच राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला राज्य हिस्याचे ₹३८०१.८१ लाख (रुपये अडतीस कोटी एक लाख एक्याऐंशी हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१७-१८ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्रमांक डी-३**
**२४०१- पीक संवर्धन**
**(००) (१०२) अन्नधान्य पिके**
**(००) (३३) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके**
**(राज्य हिस्सा) (४०% केंद्र) (२४०१ A२३४)**
**(योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य**

३. शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिस्याच्या ₹ ९५०४.५३ लाख रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरीता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हा निहाय वाटप करावयाचा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे विभागीय कृषी सह संचालकांमार्फत वितरीत करावा.

४. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या ₹ ९५०४.५३ लाख निधीचे विविध कार्यालयांच्या स्तरावर कोषागारातून आहरण व वितरणाकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी आणि सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. चालू वर्षी या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या ₹ ९५०४.५३ लाख निधीतून प्राथम्याने या अभियानांतर्गत सन २०१६-१७ मधील थकित देयकांचे प्रदान करण्यात यावे.

६. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या ₹ ९५०४.५३ लाख निधीतून अभियानांतर्गत सर्व पिकांसाठी यांत्रिकीकरणाकरिता मंजूर असलेल्या एकूण आर्थिक लक्ष्यांकाएवढा निधी १०० % सर्व संबंधित जिल्हयांना **उन्नत शेती-समृध्द शेतकरी मोहिमेंतर्गत** यांत्रिकीकरणासाठी विहीत केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत करण्यात यावा.

७. दि. १९/०५/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य स्तरावर, कृषी आयुक्तालय स्तरावर, विभागीय स्तरावर व जिल्हास्तरावर गठीत करण्यात आलेल्या समित्यांनी चालू वर्षी देखिल त्यांना विहीत केलेल्या जबाबदा-यांचे निर्वहन करावयाचे आहे तसेच, अभियान संचालक म्हणून संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांची नियुक्ती केलेली आहे.

८. केंद्रिय कृषी मंत्रालयाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य शासनास सन २०१७-१८ करीता संदर्भांकित दि. ०२ मे, २०१७ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त मान्यतेनुसार तसेच, संदर्भांकित दि. १५/०५/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार, तसेच चालू वर्षी अभियानाकरीता मंजूर केलेल्या कृति आराखडयानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय कृषी मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार

सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील, याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरुन अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

९. **उन्नत शेती - समृद्ध शेतकरी'** या मोहिमेच्या संदर्भांकित दि. १३ एप्रिल, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये तसेच, लाभार्थ्यांना थेट लाभ हस्तांतरणाबाबत (DBT) संदर्भांकित दि. १९ एप्रिल, २०१७ रोजीच्या शासन निर्णयांन्वये कृषि विभागाच्या प्रचलित योजनांतर्गत विविध घटकांची अंमलबजावणी कशाप्रकारे करावी याबाबत मार्गदर्शक सूचना विहित केलेल्या आहेत. सदर दोन्ही शासन निर्णयातील सूचनांनुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत - अन्नधान्य पिकांच्या सर्व घटकांची अंमलबजावणी करण्यात यावी.

१०.संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकाऱ्यांनी/तालुका कृषी अधिकाऱ्यांनी अभियानाकरीता लाभार्थ्यांची निवड करुन अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्याचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह, मोबाईल/दुरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. पैकी किमान एका बाबीची माहिती संकलित करण्यात यावी. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषी विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकाऱ्यांची राहील.

११.सदर लाभार्थ्यांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रामाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषी सहायकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषी अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषी अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषी सहायकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

१२. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे प्रधान सचिव (कृषी) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

१३. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दि. १८ एप्रिल, २०१७ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१४.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०७११५२२१८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2017.06.07 14:57:36 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतिः-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (कृषी व पणन), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
८. सर्व विभागीय कृषी सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
१०.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
११.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१४.सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१५.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१६.मा. मंत्री (कृषी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७.मा. राज्य मंत्री (कृषी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती.